# नावेचं गीत

लेखक: लोरेन्झ ग्रॅहम



चित्रे: लिओ आणि डायन डिलन

इथिओपिया देशातील *बोंगा* नावाच्या शहरामध्ये एका तळ्यानजिक *मोमोलू* राहात असे. तिथे प्रत्येकाकडे स्वत:ची नाव होती. ही नाव ते स्वत:च बनवत, झाडाच्या खोडापासून! पण मोमोलूचे वडील, *फ्लम्बो*, याने एका मगरीशी झालेल्या संघर्षात त्यांची नाव गमावली होती. आता नवी नाव बनवण्यासाठी फ्लम्बो एका खास झाडाचा शोध घेत होता. दिर्घकाळ चाललेल्या या शोधकामात त्याचा लहान मुलगा सतत त्याच्यासोबत असे. मोमोलू म्हणे, “हत्ती जसा मोठा डोंगर ओलांडून जातो तसंच बकरीसुद्धा मोठा डोंगर पार करते.”

या शोधामध्ये, मोमोलू आपल्या लाडक्या वडिलांना कशी मदत करतो, याची ही हृदयद्रावक गोष्ट आहे. या गोष्टीत आफ्रिकी गावाचे जीवन आणि रुढी-परंपरा यांचे सुंदर दर्शन घडते.

आफ्रिकेत अनेक जमाती वास्तव्य करतात. ते आपापल्या भाषांमध्ये संवाद साधतात. पश्चिम आफ्रिकेतील लोक *मँडिंगो, क्रू, योरुबा* किंवा *इबो* भाषा बोलतात. पण तेथील बरेच लोक इंग्रजी भाषाही शिकलेले आहेत. शाळेत गेल्यामुळे त्यांचे शब्दज्ञान वाढले आहे आणि व्याकरणही सुधारले आहे. इतर लोक साधीसरळ इंग्रजी बोलतात. ते इंग्रजी भाषेत ज्वलंत लयबद्ध कविता लिहितात.

# नावेचं गीत

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन







फ्लम्बो बोंगा शहरात पायी पायी चालतो.
तो भेटणाऱ्या प्रत्येकालाच हसतहसत “नमस्कार” म्हणतो.
पण त्याचं मन अस्वस्थ आहे, कारण त्याने आपली नाव गमावलीय.
एका मगरीने तोडली त्याची नाव!
फ्लम्बोला सगळेच ओळखतात आणि तो सर्वांनाच आवडतो.
फ्लम्बो खूप ताकदवान आहे, इतर पुरुषांच्या तुलनेत बराच ताकदवान!
तो ताकदवान आहे आणि मनाने चांगला आहे.
म्हणून लोक त्याला खूप पसंत करतात.



फ्लम्बो पाण्यानजिक जातो तेव्हा,
बरेच लोक त्याला म्हणतात,
“अरे, आता तुझ्याकडे नाव नाहीये,
तर माझी नाव वापर.
माझ्या नावेला तू आपलीच नाव समज.”

फ्लम्बो म्हणतो, “नाही!” आणि मग हसतो.
फ्लम्बो म्हणतो, “फ्लम्बोने इतरांची नाव चालवायला घेतली,
तर मगर ती नावसुद्धा तोडून टाकेल,
जशी त्याने माझी नाव तोडली.”
फ्लम्बो मोठमोठ्याने हसतो.
पण त्याचे मन मात्र उदास असते.





मग एकदा फ्लम्बो सकाळी लवकर उठतो आणि म्हणतो,
“आता मी माझ्या नावेचा शोध घेतो.”
तो आपली तलवार उचलतो, आपली कुऱ्हाड उचलतो.
त्याची पत्नी, *पोर्टी*, एका स्वच्छ कपड्यामध्ये मांसाचा तुकडा
बांधून देते.
मोमोलू तो तुकडा उचलून वडिलांसोबत चालू लागतो.



फ्लम्बो आपल्या लहानग्या मुलाला बघतो.
तो म्हणतो, “मी ज्या मार्गावर चालतोय तो खूप लांब आहे.
माझ्या छोट्याशा मुलाचे पाय चालूनचालून थकतील.”
मोमोलू वर बघतो आणि म्हणतो,
“हत्ती जसा मोठा डोंगर ओलांडतो,
तसंच बकरीसुद्धा मोठा डोंगर ओलांडते.”

मग दोघे चालू लागतात.
फ्लम्बो पुढे-पुढे चालतो. मोमोलू मागे-मागे चालतो.
ते नदीकिनाऱ्याजवळून चालू लागतात.
मग ते ती नदी सोडून दुसऱ्या नदीकिनाऱ्याजवळून
चालू लागतात.



फ्लम्बोला काळी गमची झाडे दिसतात.
त्याला ती छान वाटतात.
काही झाडे खूप मोठी असतात.
काही झाडे खूप लहान असतात.
काही झाडे सरळ नसतात.
काही झाडे स्वच्छ नसतात.
त्याला एकही झाड नावेसाठी बरे वाटत नाही.



चालूनचालून मोमोलू थकून जातो,
पण तो तक्रारीचा सूर काढत नाही.
हळूहळू सूर्य डोक्यावर येतो,
आणि मोमोलूला भूक लागते.



तेव्हा मोमोलू म्हणतो, "आता पोट पायांना मनाई करतायत.
पाय म्हणतात, *'चल'* तर पोट म्हणतंय, *'मला खायला पाहिजे.'* तुमचं
काय म्हणणं आहे बाबा?"
फ्लम्बो म्हणतो, "पोट म्हणतंय ते बरोबर आहे."
मग दोघं एका छोट्याशा नदीकिनारी बसतात.
दोघं मांसाचा तुकडा खातात.
दोघं उकडलेली कंदमुळं खातात
आणि सोबत शेंगदाणे आणि गोड संत्रीसुद्धा!
दोघं आराम करतात. दोघं थकलेयत. दोघं झोपी जातात.





मोमोलूला कुणाचीतरी हाक ऐकू येते.
“मोमोलू! मोमोलू!”
मोमोलू म्हणतो, “कोण मला हाक मारतंय?”
मोमोलूला पुन्हा हाक ऐकू येते.
“मोमोलू! मोमोलू! माझ्यासोबत चल.”



मोमोलू उठतो आणि चालू लागतो.
आपण कोणत्या दिशेत चाललोय हे मोमोलूला कळत नाही.
आपण कुठे चाललोय हे मोमोलूला कळत नाही.
मोमोलू फक्त चालत राहातो.



इतक्यात मोमोलू लोकांना हसताना ऐकतो, बोलताना ऐकतो, “हा बघा मोमोलू! आता आम्हाला खूप बरं वाटतंय, कारण आमचा चांगला मित्र आलाय.”

मोमोलू म्हणतो, “आता मला तुमचा आवाज ऐकू येतोय,
पण तुमचा चेहरा दिसत नाहीये.
तुम्ही कुठे राहाता?”
लोक म्हणतात, “तुझे डोळे उघड.”
मोमोलू डोळे उघडतो आणि मग त्याला दिसू लागते.



त्याला अगदी वेगळ्या प्रकारचे लोक दिसू लागतात. ते
इतर लोकांपेक्षा खूप आनंदी दिसत असतात.
ते बोलतात तेव्हा गाणे गातायत असं वाटतं.
ते चालतात तेव्हा हवेत तरंगतायत असं वाटतं,
आणि ते थकत नाहीत.

ते लोक म्हणतात, “आमच्यासोबत चल. तुला काही दाखवतो.”
मोमोलू त्यांच्यासोबत हवेत तरंगत जाऊ लागतो.
हळूहळू लोक म्हणतात, “आता तुला नाव दिसेल!”
मोमोलूला एक छान झाड दिसते, आजवर बघितलेल्या सर्व
झाडांहून सुंदर!”



तो पाहू लागतो तेव्हा झाडाची नाव बनते.
तो बारकाईने निरखू लागतो तेव्हा नावेचं झाड बनतं.
मोमोलू म्हणतो, “आता दिसू लागलंय मला!”



मोमोलूला फ्लम्बोचा आवाज ऐकू येतो, “चल जाऊ.”
मोमोलू म्हणतो, “थांबा बाबा, मी आपली नाव पाहिली.”
मग मोमोलूला जाग येते आणि तो गोंधळतो.
त्याला कळते, तो स्वप्न बघत होता.
तो बाबांना तसं सांगतो.
फ्लम्बो म्हणतो, “चल मुला, निघू.
आता माझा हा छोटा मुलगा पुढे पुढे चालेल,
आणि मी त्याच्या मागे मागे चालेन.”



मोमोलू चालू लागतो.
कोणत्या दिशेत जातोय, याचा गोंधळ न होता!
कुठे जातोय, याचा गोंधळ न होता!
हळूहळू तो त्या छान झाडापाशी येऊन थांबतो.
फ्लम्बो म्हणतो, “मला आपली नाव दिसतेय.
ती या झाडाच्या आत राहातेय.”



कित्येक दिवस फ्लम्बो झाडासाठी काहीतरी आणतो.
एकदा तो एक सूती कपडा आणतो,
तो निळा असतो आणि त्यावर पांढऱ्या रेषा असतात.
तो कपडा झाडाभोवती गुंडाळतो.
एकदा तो झाडाखाली एक चमकती पितळेची थाळी ठेवतो.
तो ताजे तांदूळ शिजवतो आणि थाळीत ठेवतो.
एकदा तो भोपळ्याच्या पोकळ भांड्यातून भरपूर ताडी आणतो.
तो ताडी जमिनीवर ओततो.
गमच्या झाडाच्या बुडाशी तो सारी ताडी ओतून टाकतो.



मग एकदा
पुजारी *बोमोकोको* येतो,
शहरातील साऱ्या लोकांसोबत.
ढोलवाले ढोल बडवू लागतात.



मग बोमोकोको झाडाच्या आत्म्याला हाक मारतो.
लोक गाऊ लागतात, नाचू लागतात.
हळूहळू आत्मा म्हणतो,
“ही नाव फ्लम्बोची आहे.”



फ्लम्बो कित्येक दिवस येत राहातो.
तो कापत राहातो. तो कापत राहातो. तो कापत राहातो.
हळूहळू झाड खाली पडू लागते.
पुन्हा कित्येक दिवस फ्लम्बो कापत राहातो.
तो कापत राहातो. तो कापत राहातो. तो कापत राहातो.
हळूहळू झाडाचा फक्त एकच तुकडा उरतो.







कित्येक दिवस फ्लम्बो कापत राहातो.
तो त्याला आकार देतो, त्याचं पुढचं टोक टोकदार बनवतो,
त्याचा तळ आणि आतील भाग वक्राकार बनवतो,
त्यात बसण्यासाठी जागा बनवतो, त्याला घासून गुळगुळीत
बनवतो, त्याची साफसफाई करतो.
हळूहळू नाव तयार होते.





सर्व लोक नाव बघायला येतात.

सर्व लोक म्हणतात, “व्वा!

फ्लम्बोने खरोखरच चांगली नाव बनवलीय, आधीच्या नावांपेक्षा सरस!”

फ्लम्बो म्हणतो, “माझ्या छोट्या मुलाने ही नाव शोधलीय.”

लोकांना फ्लम्बोचं बोलणं कळत नाही.



आता ते नावेत बसून फिरतात.

फ्लम्बो मागे बसतो आणि वल्हं चालवतो.

मोमोलू पुढे बसतो आणि आपला ढोल बडवत गाऊ लागतो.

पोर्टी दोघांच्या मध्ये बसते आणि ती खूप आनंदी दिसते.

ती आनंदी असते कारण तिचा पती नवी नाव बनवतो.

ती यासाठीही आनंदी असते कारण तिचा छोटा मुलगा गाणं रचतो.

नावेचं गीत ऐका. मोमोलू गातोय ते गीत ऐका:

*फ्लम्बो बनवतो नाव एक छान.*

*फ्लम्बो बनवतो नाव एक छान.*

*फ्लम्बो बनवतो नाव एक छान.*

*पाण्यालासुद्धा तिचा भारी अभिमान.*



समाप्त

